अर्थसंकल्पीय तरतुदींचे पुनर्वितरण मुख्य लेखाशिर्ष “४४०२, मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च”

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ , लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय,मुंबई- ४०० ००१
तारीख: ३१ मार्च , २०१७.

वाचा -

१) **शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८१/अर्थ-३, दि.१.४.२०१६
२) **शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८१/अर्थ-३, दि.२०.४.२०१६
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** बीयूडी-२०१५/प्र.क्र.२८१/पापु-१५, दिनांक १३.०५.२०१६
४) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** बीयूडी-२०१५/प्र.क्र.२८१/पापु-१५, दिनांक २०.०७.२०१६
५) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५१/पापु-१५, दिनांक १५.०९.२०१६
६) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** बीयूडी-२०१५/प्र.क्र.४५०/पापु-१५, दिनांक ३०.१२.२०१६

## प्रस्तावना -

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक १.४.२०१६ च्या परिपत्रकास अनुसरुन भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस माहे एप्रिल व मे या महिन्यांचा आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारणयावरील भांडवली खर्च" या लेखाशीर्षाखाली संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये लेखानुदान मंजूर व मुक्त करण्यात आले आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकास अनुसरुन सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाचा आस्थापनाविषयक खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारणयावरील भांडवली खर्च" या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेले १०० टक्के अनुदान या विभागाच्या दिनांक २०.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे.

सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात ४४०२ ११४८ या मुख्य लेखाशीर्षांतर्गत ०२ मजुरी, या उपशीर्षाखाली रु. ३.०० लाख, ०५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री या उपशिर्षाखाली रु. ९०.०० लाख इतकी तरतूद भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस मंजूर करण्यात आली आहे

मा. उच्च न्यायालय मुंबई , खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.८०६५/२०१३ मधील आदेशास अनुसरुन याचिकाकर्ते श्री. रंगनाथ नाना पटारे, श्री. सुभाष पवार आणि श्री. हरीदास पवार यांना नुकसान भरपाई व नुकसान भरपाई रक्कमांवर मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या दिनांकापासून चार महिन्यांनंतरच्या कालावधीसाठी म्हणजेच दिनांक ३०.१०.२०१५ पासून ते दिनांक २७.९.२०१६ पर्यंतच्या कालावधीवर ८% दराने व्याज अदा करण्यास शासन मान्यता प्राप्त झाली असुन याबाबतचे शासन ज्ञापन दि.२७.९.२०१६ रोजी निर्गमित करण्यात आले आहे. सदर वाढीव खर्चासाठी आवश्यक असलेला निधी सन २०१६-१७ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशिर्षाखालील ०५२ यंत्र सामग्री व साधन सामग्री या उद्दिष्टामध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ५.०० लाख इतका निधी याच लेखाशिर्षाखालील ०२ मजुरी या उद्दिष्टाखालील वाढीव खर्चासाठी पुनर्वितरीत करुन भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

तद्नंतर सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात ४४०२ ११४८ या मुख्य लेखाशीर्षांतर्गत ०२ मजुरी, या उप शीर्षाखाली रु. ३.०० लाख, ०३ अतिकालिक भत्ता या उप शीर्षाखाली रु.६.३० लाख आणि २४- पेट्रोल , तेल व वंगण या उपशीर्षाखाली रु.१००.०० लाख इतकी तरतूद भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस मंजूर करण्यात आली आहे. सन २०१६-१७ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशिर्षाखालील ०५२ यंत्र सामग्री व साधन सामग्री या उद्दिष्टामध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु.३६.०० लक्ष इतका निधी याच लेखाशिर्षाखालील ४४०२ ११४८ या मुख्य लेखाशीर्षांतर्गत ०२ मजुरी, या उप शीर्षाखाली रु. ४.५० लाख, ०३ अतिकालिक भत्ता या उप शीर्षाखाली रु.३.२० लाख आणि २४- पेट्रोल , तेल व वंगण या उपशीर्षाखालीरु.२८.३० लाख या उद्दिष्टाखालील वाढीव खर्चासाठी या विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील शासन आदेशान्वये पुनर्वितरीत करण्यात आले आहे.

आता प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद, कार्यालयाचे सन २००९ पासूनच्या थकीत भाडे प्रकरणी मा.प्रधान सचिव , पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षखालील दिनांक २८ फेब्रुवारी , २०१७ रोजीच्या बैठकीमधील चर्चेअंती भाडयाच्या रकमेबाबत तडजोड करुन रक्कम रु. ४६,८६०+ रु.७२०० ( सेवाशुल्क) असे एकुण रु.५४,०६०/- प्रतिमाह प्रमाणे भाडे अदा करण्यास मान्यता देण्यात आली . त्या अनुषंगाने औरंगाबाद प्रादेशिक कार्यालयाचे दिनांक १.०४.२००९ ते ३१.३.२०१७ पर्यंतच्या भाडयाच्या फरकाच्या रकमेची परिगणना करुन फरकाची रक्कम रु.३४,६४,३५२/- मराठवाडा विकास महामंडळास अदा करण्याकरिता अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय-

प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद, कार्यालयाचे सन २००९ पासूनच्या थकीत भाडे प्रकरणी मा.प्रधान सचिव , पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे अध्यक्षखालील दिनांक २८ फेब्रुवारी, २०१७ रोजीच्या बैठकीमधील चर्चेअंती भाडयाच्या रकमेबाबत तडजोड करुन रक्कम रु. ४६,८६०+ रु.७२०० ( सेवाशुल्क) असे एकुण रु.५४,०६०/- प्रतिमाह प्रमाणे भाडे अदा करण्यास मान्यता देण्यात आली . त्या अनुषंगाने औरंगाबाद प्रादेशिक कार्यालयाचे दिनांक १.०४.२००९ ते ३१.३.२०१७ पर्यंतच्या भाडयाच्या फरकाच्या

रकमेची परिगणना करुन फरकाची रक्कम रु.३४,६४,३५२/- मराठवाडा विकास महामंडळास अदा करण्याकरिता अनुदान उपलब्ध करुन संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सन २०१६-१७ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशीर्षाखालील ११- प्रवास खर्च, ५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री व ५३ मोठी बांधकामे या उद्दिष्टांमध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ३४.६५ लाख इतका निधी याच लेखाशीर्षाखालील १४- भाडेपट्टी व कर या उद्दिष्टांखालील वाढीव खर्चासाठी सोबतच्या विवरणपत्र क्र. १ व २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पुनर्वितरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संबंधित अधिकाऱ्यांनी विवरणपत्र क्र. १ व २ मधील स्तंभ क्र. ६ खाली दर्शविण्यात आलेल्या पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीच्या वितरणाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१६५२५३११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.31 16:57:55 +05'30'

**(चेतन निकम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
४. उप अभियंता ( यां ), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / २ - नागपूर ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग ( व्यय - ३), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी, पापु-०१, पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती (पापु-१५)

(शासन निर्णय क्र. बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५, दि. ३१ मार्च , २०१७)

**विवरणपत्र क्र. १**

वित्तीय वर्ष २०१६-१७ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

( रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशीर्ष/ उपशीर्ष | अर्थसंकल्पीय अनुदान | दिनांक १५.९.२०१६ रोजीच्या पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | दिनांक ३०.१२.२०१६ रोजीच्या पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | पुर्नवाटप करावयाची रक्कम | पुर्नवाटपानंतर शिल्लक तरतूद | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | |
| १ | ११ प्रवास खर्च | ४५.०० | - | - | १५.०० | ३०.०० | औरंगाबाद प्रादेशिक कार्यालयाचे दिनांक १.०४.२००९ ते ३१.३.२०१७ पर्यंतच्या भाडयाच्या फरकाची रक्कम अदा करण्यासाठी रु.३४,६४,३५२ इतके अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे |
| २ | ५२- यंत्र साधनसामग्री | ९०.०० | ८५.०० | ४९.०० | १४.६५ | ३४.३५ | |
| ३ | ५३- मोठी बांधकामे | ५.०० | - | - | ५.०० | ०.०० | |
| | एकूण | | | | **३४.६५** | | |

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.31 16:59:39 +05'30'

(चेतन निकम)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

(शासन निर्णय क्र. बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५, दि. ३१ मार्च, २०१७)

**विवरणपत्र क्र. २**

वित्तीय वर्ष २०१६-१७ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | लेखाशीर्ष/ उपशीर्ष | अर्थसंकल्पी अनुदान | दिनांक १५.९.२०१६ रोजीच्या पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | दिनांक ३०.१२.२०१६ रोजीच्या पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | पुर्नवाटप करावयाची रक्कम | पुर्नवाटपानंतर शिल्लक तरतूद | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | १४-भाडेपट्टी व प्रवास खर्च | २७.०० | - | - | ३४.६५ | ६१.६५ | औरंगाबाद प्रादेशिक कार्यालयाचे दिनांक १.०४.२००९ ते ३१.३.२०१७ पर्यंतच्या भाडयाच्या फरकाची रक्कम अदा करण्यासाठी रु.३४,६४,३५२ इतके अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे |
| | एकूण | २७.०० | | | ३४.६५ | ६१.६५ | |

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d8086 3da34d0a26661f5eefb602c359549d8e d4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.31 17:04:03 +05'30'

(चेतन निकम)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन